१३५८५००01-0३००

**महाराष्ट्र शासन**

**महसूल व वन विभाग.**

शासन परीपत्रक क्र.गौखनि १०/२००१/प्र.क्र.३०८/ख

मंत्रालय, मुंबई -३२.

दिनांक : १५ डिसेंबर, २००३.

**विषय :- रोजगार हमी योजनेच्या कामाकरीता वापरण्यात येणा-या गौण खनिजावरील स्वामित्वधनाबाबत**

पहा :- शासन निर्णय, महसूल व वन विभाग क्र. गौखनि- १०८८/४३३/३५९२ /ख, दिनांक १८ ऑक्टोबर,२००१

**परीपत्रक : -**

राज्य शासनाचे सर्व प्रशासकीय विभाग, यंत्रणा व महामंडळे/ मंडळे यांच्या कामासाठी लागणा-या गौण खनिजावर शासनाने निहित केलेल्या दराने स्वामित्वधनाची आकारणी व वसूली करण्याचा निर्णय शासनाने शासन निर्णय, महसूल व वन विभाग क्र. गौखनि-१०८८/४३३/३५९२/ख, दिनांक १८ऑक्टोबर,२००१ अन्वये घेतला आहे. मात्र रोजगार हमी योजने अंतर्गत घेण्यात येणा-या कामांकरीता आवश्यक असलेल्या गौण खनिजावर स्वमित्वधनाची आकारणी करण्याबाबत शासनाचे निश्चित धोरण काय आहे अशी विचारणा जिल्हाधिका-यांकडून करण्यात येत होती. याबाबत दिनांक १०/९/२००३ रोजी मुख्य सचिवांच्या अध्यक्षतेखाली झालेल्या बैठकीत याबाबत पुढील प्रमाणे निर्णय घेण्यात आले आहेत.

१) कालव्याच्या व रस्त्याच्या अथवा त्या लगतच्या गटाराच्या कामासाठी केलेल्या उत्खननातून उपलब्ध होणाऱ्या गौण खनिजांचा त्याच ठिकाणच्या कामाकरिता अथवा अन्यत्र गौण खनिज म्हणून वापर केल्यास, वापरलेल्या गौण खनिजापोटी विहित दराने स्वामित्वधनाची आकारणी व वसूली करण्यात यावी.

२) पाझर तलाव, गाव तलाव, नालाबंद, शेततळे,वन तलावासाठी रोधीचर (cot) तसेच बांधकामाचा पाया यासाठी केलेल्या खोदाईतून उपलब्ध होणाऱ्या गौण खनिजांचा त्याच ठिकाणच्या अथवा इतर ठिकाणच्या कामासाठी गौण खनिज म्हणून वापर केल्यास त्यावर विहित दराने स्वामित्वधनाची आकारणी व वसूली करण्यात यावी.

३) रोहयो कामासाठी इतर ठिकाणातून (Quarry and borrow areas) गौण खनिज वाहून आणल्यास त्यावरही विहित दराने स्वामित्वधन वसूली करण्यात यावे.

४) रोहयो कामासाठी लागणाऱ्या गौण खनिजावरील स्वामित्वधन भरण्यासाठी लागणाऱ्या निधीची रोहयो च्या अंदाजपत्रकातच स्वतंत्र तरतूद करण्यात यावी. रोहयो

कामासाठी वापरण्यात देणाऱ्या गौण खनिजावरील स्वामित्वधनाची रक्कम संबंधित जिल्हाधिकारी,जिल्हा स्तरावरच उपरोक्त निधीतून महसूल निधीत जमा करील.

संबंधित क्षेत्रिय महसूल अधिका-यांनी व शासनाच्या नियोजन विभागाने (रोजगार हमी योजना) त्या अनुषंगाने पुढील आवश्यक ती कार्यवाही करावी.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

(अरविंद चौधरी)
शासनाचे सहसचिव
महसूल व वन विभाग

प्रति,

विभागीय आयुक्त, (महसूल) (सर्व),
जिल्हाधिकारी, (सर्व),
मुख्य कार्यकारी अधिकारी, (सर्व), जिल्हापरीषद
जिल्हा नियोजन अधिकारी,(सर्व)
संचालक, भूविज्ञान व खनिकर्म संचालनालय, नागपूर,
महालेखापाल-१, (लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र राज्य, मुंबई
महालेखापाल-१, (लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र राज्य, नागपूर.
कार्यासन अधिकारी, (व्यय-९), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
कार्यासन अधिकारी, (रो.ह.यो.), नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
कार्यासन अधिकारी, (ख) महसूल व वन विभाग, मंत्रालय,निवडनस्ती करीता.